२०१००४२७१४१९२५००१

शासकीय कार्यालयात फ्रँकिंग मशिनचा वापर करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्र. जिपले२०१०/११०/प्र.क्र.२८/पंरा-९,
मंत्रालय, मुंबई-३२,
दिनांक : २३ एप्रिल, २०१०.

पहावे :- (१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एमआयएस-१००१/ प्र.क्र.४६/२००१/१८ (र.व का.),दि.२६/११/२००१.
(२) शासन निर्णय, समक्रमांक दि. २९ मार्च,२०१०

**परिपत्रक :**

शासकीय कार्यालयात फ्रँकिंग मशिनचा वापर करण्यासाठी फ्रँकिंग मशिनची खरेदी तसेच त्याची देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी सर्व विभाग प्रमुखाना वित्तीय अधिकार यापूर्वीच प्रदान करण्यात आले असून ज्या कार्यालयांनी अद्यापपर्यंत फ्रँकिंग मशिनची खरेदी केली नसेल त्यांनी यासंदर्भात आवश्यक कार्यवाही करण्याच्या सूचना उपरोक्त परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत.

२. तसेच उपरोक्त शासन निर्णयान्वये सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना त्यांच्या अखत्यारीतील ज्या कार्यालयांनी अद्याप पर्यंत फ्रँकिंग मशिनची खरेदी केली नसेल त्यांनी उपरोक्त शासन परिपत्रक व वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन खरेदी करावी अशा सूचना देण्यात आल्या आहेत. या अनुषंगाने असे कळविण्यात येते की, अशी खरेदी करताना केंद्र शासनाने निर्देशित केलेल्या भारतीय राष्ट्रीय उपभोक्ता सहकारी संघ मर्यादित, मुंबई यांनी सूचित केलेल्या पिटनी बाऊज इंडिया प्रा.लि. या कंपनीच्या फ्रँकिंग मशीन्सचा प्रामुख्याने विचार करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दि. ग. मोरे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता ), १/२ मुंबई / नागपूर,
२) महालेखापाल, (लेखा परिक्षा), १/२ मुंबई / नागपूर,

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,
५) मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
६) मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग,
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८) सर्व उपकोषागार अधिकारी,
९) मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणा खालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख.
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) सर्व जिल्हाधिकारी,
१२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१३) सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
१४) ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व अधिकारी / कार्यासने,
१५) पंरा-९ कार्यासन संग्रहार्थ,